सन २०१९-२० या वर्षाकरीता वाईन उद्योगास प्रोत्साहन निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक:- वाप्रोअ-२०१९/ प्र.क्र.११०/ उद्योग-२**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक :- ०५ मार्च, २०२०**

संदर्भ :-

१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्रमांक डब्ल्यूआयपी २००९/ प्र.क्र.३२८ / २००९/ उद्योग- २, दिनांक ३१/०८/ २००९.

२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन परिपत्रक क्र. डब्ल्यूआयपी २००९/ प्र.क्र.३२८ / २००९ / उद्योग- २, दिनांक ०१/०२/ २०१०.

३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचे शासन शुध्दीपत्रक क्रमांक डब्ल्यूआयपी २००९ / प्र.क्र.३२८/ उद्योग- २, दिनांक २१/०८/२०१०.

४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचे शासन शुध्दीपत्रक क्र. वाप्रोअ-१७१४/प्र. क्र. ३/ उद्योग-२, दिनांक २७/१०/२०१४.

५) अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय यांचे पत्र क्र. उसं/ साप्रोयो/ वाईन प्रोत्साहन अनुदान-२०१९-२०/ अे-१०२४, दि.२०/०७/२०१९

६) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन ज्ञापन क्रमांक वाप्रोअ-२०१९/प्र.क्र. ११०/उद्योग-२, दिनांक २६/०७/२०१९

७) अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय यांचे पत्र क्र. उसं/ साप्रोयो/ वाईन प्रोत्साहन अनुदान/ वितरण/ २०१९/ अे-१२२२, दि.३०/०८/ २०१९

८) अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय यांचे पत्र क्र. उसं/ साप्रोयो/ वाईन प्रोत्साहन अनुदान/ दावे/ २०१९/ अे-१४६७, दि.१५/११/२०१९

९) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. बियुडी-२०२०/२०१९-२०/प्र.क्र.०२/ प्रशासन-१, दि.१६/०१/२०२०

१०) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/ प्र.क्र.९२/ अर्थ-३, दि.२२/०१/२०२०.

११) अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय यांचे पत्र क्र. उसं/ साप्रोयो/ वाईन प्रोत्साहन अनुदान/ दावे/ २०१९/ अे-१३२, दि.२७/०१/२०१९

**ज्ञापन :-**

राज्यातील द्राक्षावर आधारीत वाईन उद्योगास प्रोत्साहन म्हणून शासनाने द्राक्ष प्रक्रिया उद्योग धोरण-२००१ दि.१९/१०/२००१ रोजी अमलात आणले आहे, त्याअनुषंगाने सदर उद्योगाला प्रोत्साहन म्हणून राज्यामध्ये उत्पादीत केलेल्या व अंतिमत: विक्री झालेल्या वाईनच्या विक्रीवर देय असलेल्या २० टक्के मुल्यवर्धीत कर भरल्यास त्यापैकी १६ टक्के कराच्या रकमेइतके वाईन प्रोत्साहन अनुदान वाईन उद्योगास देण्याबाबत शासनाची योजना आहे. सदर योजनेअंतर्गत वित्तीय तरतूद अपुरी असल्याने शासनाकडे प्रोत्साहन परताव्याचे प्रलंबित असलेले दावे टप्प्याटप्प्याने मंजूर करण्यात आले आहेत. यापूर्वी दि.२६/०७/२०१९ च्या शासन ज्ञापनान्वये ३५ दाव्यांकरीता रुपये ९ कोटी व दि.२२/०१/२०२० च्या शासन ज्ञापनान्वये २३ दाव्यांकरीता रुपये १२ कोटी एवढा निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. प्रस्तुत प्रकरणी राज्यकर सह आयुक्त (व्हॅट व्यवस्थापन) नाशिक विभाग नाशिक, राज्यकर सह आयुक्त

मोठे करदाते कक्ष-३ मुंबई, राज्यकर सह आयुक्त पुणे विभाग पुणे, राज्यकर सह आयुक्त (व्हॅट व्यवस्थापन) सोलापूर विभाग सोलापूर यांचेकडून प्रोत्साहन परताव्याबाबत प्राप्त प्रस्ताव व त्याअनुषंगाने अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय, मुंबई यांचे उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र. ०५, ०७, ०८ व ११ च्या पत्रान्वये केलेली शिफारस विचारात घेता सद्यस्थितीत शासनाकडे २८ दावे प्रलंबित असून सदर दावे निकाली काढण्याकरीता रुपये ५१,७२,५९,८३९/- एवढ्या निधीची आवश्यकता आहे. तथापि, सन २०१९-२० या वर्षामध्ये या योजनेकरीता संदर्भाधिन क्र.९ येथील शासन निर्णयान्वये रुपये ६ कोटी एवढी रक्कम पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन देण्यात आली आहे. तसेच वित्त विभागाच्या दि.२२/०१/२०२० च्या परिपत्रकान्वये या योजनेकरीता सन २०१९-२० या वर्षात मंजूर केलेल्या रुपये १५ कोटीपैकी ८०% इतक्या मर्यादेत खर्च करण्यास दिलेल्या परवानगीनुसार रुपये ३ कोटी इतका निधी अशा प्रकारे एकूण रुपये ९ कोटी एवढा निधी बिडीएस प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध आहे. सदर योजनेकरीता उपलब्ध असलेला निधी विचारात घेऊन, संदर्भ क्रमांक १ ते ४ येथे नमूद केलेल्या शासन निर्णय / परिपत्रक/ शुध्दीपत्रकातील तरतुदी, निकष, पात्रता इत्यादींची पडताळणी/शर्तीची काटेकोर अंमलबजावणी करण्याची खात्री करुन घेण्याच्या अटीच्या अधीन राहून, सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील रकाना क्र.७ मध्ये नमूद केल्याप्रमाणे संबंधित घटकांना रुपये ९,००,००,०००/- (रुपये नऊ कोटी मात्र) इतका निधी वितरीत करण्यास या ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेसाठी होणारा खर्च, मागणी क्रमांक - के ७, लेखाशिर्ष २८५२ - उद्योग (००)(११) वाईन उद्योगास प्रोत्साहन (अनिवार्य) (२८५२ ०४७२), ३३ -अर्थसहाय्य या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी मंजूर अर्थसंकल्पिय अनुदानातून व पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वरील परिच्छेदामध्ये नमूद केलेल्या एकूण रुपये ९,००,००,०००/- (अक्षरी नऊ कोटी मात्र) एवढ्या रकमेच्या आहरणाचे आणि महाराष्ट्र विक्रीकर रोखे प्राधिकरणास वितरीत करण्याचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे कार्यालयातील लेखाधिकारी यांना देण्यात येत आहेत.

४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांना कळविण्यात येते की, सदर धनादेश लेखाधिकारी, उद्योग संचालनालय यांचे नावे काढण्यात यावा व उद्योग संचालनालयाकडून सदर निधी महाराष्ट्र विक्रीकर रोखे प्राधिकरण, मुंबई यांना अदा करण्यात यावा.

५. या शासन ज्ञापनान्वये मंजूर केलेल्या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र उद्योग संचालनालयाने महाराष्ट्र विक्रीकर रोखे प्राधिकरणाकडून प्राप्त करुन शासनास त्वरीत सादर करावे.

६. हे शासन ज्ञापन वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दि.०१/०४/२०१९, दि.०८/०७/२०१९ व दि.२२/०१/२०२०अन्वये दिलेल्या सूचना व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२१८/२०१९, दि.१३/०२/२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संगणक संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२००१२२१२२७४७४५१० असा आहे. हे शासन ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vinod Sopanrao Mendhe

Digitally signed by Vinod Sopanrao Mendhe
DN: CN = Vinod Sopanrao Mendhe, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Industries, Energy and Labour Department
Date: 2020.03.06 11:46:57 +05'30'

**( वि.सो.मेंढे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई-४०० ०३२. (५ जादा प्रतीसह)

२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.

३. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), नागपूर.

४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

६. वित्त विभाग, (कार्यासन अर्थसंकल्प-१४/व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

७. राज्यकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई -४०० ०१०.

८. राज्यकर सह आयुक्त, विक्रीकर भवन, नाशिक विभाग, पाथर्डी फाटा, नाशिक-४२२०१०.

९. राज्यकर सहआयुक्त (व्हॅट व्यवस्थापन) सोलापूर विभाग, विक्रीकर भवन, विजापूर रोड, सोलापूर.

१०. राज्यकर सह आयुक्त, मोठे करदाते कक्ष-३, वस्तू व सेवा करभवन, माझगाव, मुंबई

११. राज्यकर सह आयुक्त, पुणे विभाग, पुणे

१२. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, मुंबई.

१३. संबंधित घटक नाशिक/ पुणे/ सोलापूर.

१४. कक्ष अधिकारी, (प्रशासन-१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय -४०० ०३२.

१५. निवड नस्ती, (उद्योग-२).

| उद्योग,उर्जा व कामगार विभाग शासन ज्ञापन क्र. वाप्रयो -२०१९/प्र.क्र ११०/उद्योग-२, दि.०५ मार्च, २०२० सोबतचे विवरणपत्र | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| अ. क्र | घटकांचे नाव | कालावधी (दिनांक) | दाव्याची मूळ रक्कम | दि. २६.०७.२०१९ रोजीच्या शासन ज्ञापनान्वये वितरीत करण्यात आलेला निधी (रुपये) | दि. २२.०१.२०२० रोजीच्या शासन ज्ञापनान्वये वितरीत करण्यात आलेला निधी (रुपये) | अ.क्र. ५ व ६ येथील रक्कम वाटप केल्यानंतर शिल्लक राहिलेल्या रकमांपैकी मंजूर करण्यात येणारी रक्कम (रूपये) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | सुला वाईनयार्ड प्रा.लि.नाशिक | ०१/१०/२०१७ ते ३१/०३/२०१८ | १५,४०,०६,३३७ | १,५५,००,००० | ४,३५,०३,७८३ | १,५९,१२,९२८ (९,५०,०२,५५४ पैकी) |
| २ | गुड ड्रॉप वाईन सेलर्स प्रा.लि.नाशिक | ०१/१०/२०१७ ते ३१/०३/२०१८ | १,४९,६१,४९१ | ४०,००,००० | ५४,९४,१२९ | ९,१५,७८३ (५४,६७,३६२ पैकी) |
| ३ | ग्रोवर झंपा वाईनयार्डस् लि. नाशिक | ०१/१०/२०१७ ते ३१/०३/२०१८ | १,४२,२२,९४८ | ४०,००,००० | ५२,९४,१३० | ८,२५,५७७ (४९,२८,८१८ पैकी) |
| ४ | यॉर्क वाईनरी प्रा.लि.नाशिक | ०१/१०/२०१७ ते ३१/०३/२०१८ | ८७,७७,२०२ | ------- | ४०,००,००० | ८,००,१८१ (४७,७७,२०२ पैकी) |
| ५ | एन.डी.वाईन्स प्रा.लि.नाशिक | ०१/०४/२०१८ ते ३०/०९/२०१८ | ६०,५१,७५६ | ----- | ३०,००,००० | ५,११,१६९ (३०,५१,७५६ पैकी) |
| ६ | सुला वाईनयार्डस् प्रा. लि. नाशिक | ०१/०४/२०१८ ते ३०/०९/२०१८ | ९,४७,६२,६५० | ------ | ------- | १,५८,७२,७४४ |
| ७ | मोईत हेन्नेसी इंडिया प्रा.लि.मुंबई | ०१/१०/२०१७ ते ३१/०३/२०१८ | ८१,६२,५७२ | ------ | ------- | १३,६७,२३१ |
| ८ | मोईत हेन्नेसी इंडिया प्रा.लि.मुंबई | ०१/०४/२०१८ ते ३०/०९/२०१८ | ७१,०२,२३१ | ----- | ------ | ११,८९,६२४ |
| ९ | यॉर्क वाईनरी प्रा. लि. नाशिक | ०१/०४/२०१८ ते ३०/०९/२०१८ | ५८,३२,०२८ | ----- | ------- | ९,७६,८६५ |
| १० | गुड ड्रॉप वाईन सेलर्स लि. नाशिक | ०१/०४/२०१८ ते ३०/०९/२०१८ | १,०४,२९,२५० | ----- | ------ | १७,४६,८९९ |
| ११ | सुला वाईनयार्डस् प्रा.लि.नाशिक | ०१/१०/२०१८ ते ३१/०३/२०१९ | २०,५०,५४,२६९ | ----- | ------ | ३,४३,४६,५९० |
| १२ | विनस सेलर्स प्रा.लि.नाशिक | ०१/१०/२०१८ ते ३१/०३/२०१९ | ५१,७३,२७३ | ----- | ------ | ८,६६,५२३ |
| १३ | एन.डी.वाईन्स प्रा.लि.नाशिक | ०१/१०/२०१८ ते ३१/०३/२०१९ | ६९,९६,६३७ | ------ | ------ | ११,७१,९३७ |
| १४ | सेवन पिक्स वाईनरी प्रा.लि.नाशिक | ०१/०४/२०१५ ते ३०/०९/२०१५ | २,२४,६१५ | ------ | ----- | २,२४,६१५ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | (Balance १५%) | | | | |
| १५ | सेवन पिक्स वाईनरी प्रा.लि.नाशिक | ०१/१०/२०१५ ते ३१/०३/२०१६ (Balance १५%) | ३,९४,४४० | ------ | ----- | ३,९४,४४० |
| १६ | सेवन पिक्स वाईनरी प्रा.लि.नाशिक | ०१/०४/२०१६ ते ३०/०९/२०१६ (Balance १५%) | २,३२,५०८ | ------ | ------ | २,३२,५०८ |
| १७ | सेवन पिक्स वाईनरी प्रा.लि.नाशिक | ०१/१०/२०१६ ते ३१/०३/२०१७ (Balance १५%) | २,३२,१४३ | ------ | ------- | २,३२,१४३ |
| १८ | फ्रटेली वाईन्स प्रा.लि.सोलापूर | ०१/०४/२०१४ ते ३१/०३/२०१५ | ३५,८०,०५४ | ------ | ------ | १७,९०,०२७ |
| १९ | मोईत हेन्नेसी इंडीया प्रा.लि.नाशिक | ०१/१०/२०१८ ते ३१/०३/२०१९ | ९८,९७,०६१ | ----- | ----- | १६,५७,७५८ |
| २० | गुड ड्रॉप वाईन सेलर्स लि.नाशिक | ०१/१०/२०१८ ते ३१/०३/२०१९ | १,९२,५६,०६९ | ------ | ------- | ३२,२५,३९२ |
| २१ | शिवप्रसाद वाईन्स प्रा.लि.नाशिक | ०१/१०/२०१८ ते ३१/०३/२०१९ | ३,२०,५३९ | ---- | ----- | ३,२०,५३९ |
| २२ | सुला वाईनयार्डस् प्रा.लि.नाशिक | ०१/०४/२०१४ ते ३०/०९/२०१४ (Balance १५%) | ७५,६९,२५३ | ----- | ------ | १२,६७,८५० |
| २३ | सुला वाईनयार्डस् प्रा.लि.नाशिक | ०१/१०/२०१४ ते ३१/०३/२०१५ (Balance १५%) | १,६२,१४,५७२ | ------ | ----- | १५,५२,६९४ |
| २४ | राजधीर वाईन्स प्रा.लि.नाशिक | ०१/०४/२०१४ ते ३०/०९/२०१४ (Balance १५%) | ५,३५,६८६ | ---- | ----- | ५,३५,६८६ |
| २५ | विनलॅण्ड वाईन्स कंपनी प्रा.लि. नाशिक | दि.०१/१०/२०१८ ते ३१/०३/२०१९ | १७,०३२ | ----- | ----- | १७,०३२ |
| २६ | पेरनॉड रिकार्ड इंडीया प्रा.लि.नाशिक | दि.०१/१०/२०१८ ते ३१/०३/२०१९ | २,०८,३१३ | ------ | ------ | २,०८,३१३ |
| २७ | हिल क्रेस्ट फुडस् ॲण्ड बेवरेजेस प्रा.लि. पुणे | ०१/१०/२०१८ ते ३१/०३/२०१९ | ९,९६,५४८ | ------ | ------ | ९,९६,५४८ |
| २८ | हिल क्रेस्ट फुडस् ॲण्ड बेवरेजेस प्रा.लि. पुणे | ०१/०४/२०१९ ते ३०/०९/२०१९ | ८,४०,४०४ | ------ | ------- | ८,४०,४०४ |
| | | | | | **एकूण** | **९,००,००,०००** |

Vinod Sopanrao Mendhe

Digitally signed by Vinod Sopanrao Mendhe
DN: CN = Vinod Sopanrao Mendhe, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Industries, Energy and Labour Department
Date: 2020.03.06 11:47:17 +05'30'

**( वि.सो.मेंढे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**